निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेअंतर्गत ६ अतिरिक्त पदांच्या वेतन व भत्यांचा खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : चाबाप्र-२०१३/प्र.क्र.१९६/फ-५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १२ फेब्रुवारी,२०१५.

<u>वाचा</u>:- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र.४५/(१३-१४)/१४८९, दि.३१/१०/२०१३.
२) शासन निर्णय क्रमांक,महसूल व वन विभाग सम क्रमांक दि.९ जुन २०१४.
३) शासन निर्णय क्रमांक,महसूल व वन विभाग सम क्रमांक दि. ८ जुलै २०१४.
४) शासन निर्णय क्रमांक,महसूल व वन विभाग सम क्रमांक दि. २ फेब्रुवारी २०१५.
५) शासन निर्णय क्र.चाबाप्र २०१३/ प्र.क्र.१९६/फ-५ दि.२८.०२.२०१४.
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प -३ दि.९.०२.२०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत सांगली जिल्ह्यातील कडेगांव तालुक्यातील मौजे सोनसळ येथील चौरंगीनाथ या पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१९८/शिकाना/फ-५, दि.२२/१२/२०१० अन्वये ६ अतिरिक्त पदांच्या निर्मितीस मंजूरी देण्यात आली आहे. शासन निर्णय संदर्भ क्र.५ अन्वये सदरहू पदांना दि.१/३/२०१४ ते २८/२/२०१५ या कालावधीपर्यत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे. या पदांचे वेतन व इतर अनुषंगीक खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत सांगली जिल्ह्यातील कडेगांव तालुक्यातील मौजे सोनसळ येथील चौरंगीनाथ या पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या या पदांचे वेतन व इतर अनुषंगीक खर्च भागविण्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी रू. १०.३० लक्षची तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज -२०१३/प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प -३ दि.२ जानेवारी २०१५ अनुसार योजनातर्गत अर्थसंकल्पीत निधी ६० % वितरीत करण्यास मंजुरी देण्यात आली असून ०१- वेतन या उद्दिष्टा खालील १०० % रू.१०.०० लक्ष व ११- प्रवास भत्ता या उद्दिष्टा खाली ६० % निधी रू.०.१८ लक्ष असा एकुण रू.१०.१८ लक्ष निधी मंजुर करण्यात आला आहे.

वित्त विभाग शासन परिपत्रक संदर्भ क्र.६ दि.९.०२.२०१५ नुसार आता या योजनेंतर्गत अर्थसंकल्पीत निधीच्या ७५ टक्के निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून ११- प्रवास भत्ता या उद्दिष्टाखाली या योजनेसाठी रूपये ४५००/- इतका निधी खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रूपयात)

| उद्दिष्ट | रक्कम |
|---|---|
| ११ प्रवास भत्ता | रू. ४५००/- |
| एकुण | रू. ४५००/- (चार हजार पाचशे फक्त) |

सदर खर्च सन २०१४-१५ करिता लेखाशिर्ष २४०६ वनिकरण व वन्यजीवन राज्य योजनातंर्गत योजना पंचवार्षिक योजनांतर्गत (०२)(०६) इको टूरिझम (राज्य) (२४०६ २२९५) अंतर्गत उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प -३ दि.९.०२.२०१५अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१६१६४५१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.13 16:26:00 +05'30'

**(डॉ. यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर .
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास)/(कार्मिक), म.रा.नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
४) उप विभागीय वनाधिकारी, सांगली.
५) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली / कोल्हापूर
९) निवडनस्ती , फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२